हरित ऊर्जा निधी कार्यक्रमातंर्गत राजभवन, पुणे येथील १ मे.वॅ.क्षमतेच्या पारेषण संलग्न सौर विद्युत निर्मिती प्रकल्पास निधी वितरित करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
उद्योग, उर्जा व कामगार विभाग
शासन निर्णय क्रमांकः बियुडी-२०१७/प्र.क्र.३२२/ऊर्जा-७.
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ०३२.
दिनांक: १७ सप्टेंबर, २०२१.

संदर्भ :

१. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,क्र.सौरप्र-२०१५/प्र.क्र.२२/उर्जा-७,दि ३१.०३.२०१५.
२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,क्र.सौरप्र- २०१७/प्र.क्र.२२/उर्जा-७, दि३०.०३.२०१७.
३. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,क्र.बीयुडी-२०१७/प्र.क्र.३२२/उर्जा-७,दि ०४.०१.२०१९.
४. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,क्र.बीयुडी-२०१७/प्र.क्र.२६१/उर्जा-७, दि १५.०१.२०१९.
५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१.
६. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २९.०७.२०२१.
७. महाऊर्जा, पुणे कार्यालयाचे पत्र क्र.लेखा/बीपी-०२०/जी.सी.एफ.-२०२१-२२/२१-२२/३४८३, दि.१६.०७.२०२१.

प्रस्तावना :-

राजभवन, पुणे येथे १ मे.वॅ.क्षमतेच्या पारेषण संलग्न सौर विद्युत निर्मिती प्रकल्पास १ वर्षाच्या हमीसह पुढील दहा वर्षासाठी देखभाल दुरूस्तीच्या समावेशासह रु. ८८१.०० लक्ष खर्चास संदर्भाधिन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिली आहे. संदर्भाधिन क्र.४ च्या शासन निर्णयान्वये महाऊर्जास सदर प्रकल्पातंर्गत शिल्लक देयक अदा करण्यासाठी फेरवाटपाद्वारे उपलब्ध करून देण्यात आलेला रु. १८१.७३ लक्ष इतका निधी अखर्चित राहिल्याने सदर निधी शासनास समर्पित करण्यात आला होता. सदर पारेषण संलग्न सौर विद्युत निर्मिती प्रकल्पाची एकूण किंमत रु. ७३५.२५ लक्ष पैकी रु. ६९२.०० लक्ष एवढी रक्कम मे.रिलायऑन सोलर प्रा.लि.,पुणे यांना अदा करण्यात आली असून उर्वरित रक्कम रु.४३.३५०० लाख इतकी रक्कम अदा करावयाची बाकी आहे. तसेच पुढील १० वर्षाच्या देखभाल, दुरूस्तीसाठी प्रतिवर्षी रक्कम रु.१२.९७५० लक्ष इतक्या रकमेची आवश्यकता आहे. सबब, मे.रिलायऑन सोलर प्रा.लि.,पुणे यांना अदा करावयाची शिल्लक रक्कम रु.४३.२५०० लक्ष तसेच सन २०२०-२१ व २०२१-२२ करिताचे दुरूस्तीसाठी प्रतिवर्ष रक्कम रु. १२.९७५० लक्ष प्रमाणे दोन वर्षांचे रु. २५.९५०० लक्ष अशी एकूण रु. ६९.२००० लक्ष इतका निधी महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरणास वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण यांच्या विनंतीस अनुसरून, हरित ऊर्जा निधी कार्यक्रमातंर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी लेखाशीर्ष २८१००१२३ खालील अर्थसंकल्पिय तरतूद रुपये २५.०० कोटी मधून राजभवन, पुणे येथील १ मे.वॅ. क्षमतेच्या सौर विद्युत निर्मिती प्रकल्पास रु.६९,२०,०००/- (रु.एकोणसत्तर लाख वीस हजार फक्त) इतका निधी महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण यांस वितरित करण्यास याद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम अदा करण्यासाठी श्री. उ. द. वाळुंज, सह सचिव (ऊर्जा), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व श्री. ना. रा. ढाणे, अवर सचिव, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर निधी महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (Director General, Maharashtra Energy Development Agency) यांच्या नावे अदा करण्यात यावा.

४. सदर अनुदान लेख्यासंबंधीची कागदपत्रे, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरणाने आवश्यक तेव्हा महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांच्याकडे तपासणीसाठी सादर करावीत.

५. याबाबतचा खर्च "मागणी क्रमांक-के-६, मुख्य लेखाशीर्ष - २८१०, नवीन व नवीकरणीय ऊर्जा साधने, राज्यांतर्गत योजना (००) (०५) महाराष्ट्र ऊर्जा विकास निधीतून भागविलेला खर्च (कार्यक्रम)३१,सहायक अनुदाने (वेतनेत्तर) ५०, इतर खर्च (२८१००१२३) या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या चालू आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. हरित ऊर्जा कार्यक्रमातंर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरणला निधी वितरीत करतांना शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून, २०२१ च्या परिशिष्टातील तपासणीसूची मधील अटींची पूर्तता होत असून तसेच सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०५/२०२१/का.१४६१, दिनांक १८.०८.२०२१ व वित्त विभागाच्या अनौपचरिक संदर्भ क्र.३९३९/व्यय-१६, दिनांक ०७.०९.२०२१ अन्वये प्राप्त झालेल्या सहमती/मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून, २०२१ मधील सर्व तरतूदींचे पालन महाऊर्जाने करावे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९१७१२१३२८९३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT PUNDLIK BADGERI

Digitally signed by PRASHANT PUNDLIK BADGERI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=07ae22a8e7fa4047ce6ff816d85e77eec14db9926b325a140acf9b28bb990786, pseudonym=AC7259A119539CB47009F7E30F693EAB895718AB, serialNumber=EC955E2D360E1FDDB6ABAC58A907419053BEECEB5DBAC48A78C89C588FF71BEF, cn=PRASHANT PUNDLIK BADGERI
Date: 2021.09.17 12:35:58 +05'30'

(प्र. पुं. बडगेरी)

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे.
२.महालेखापाल, महाराष्ट्र-१, ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई- ४०० ००१
३.महालेखापाल, महाराष्ट्र-२, ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर
४.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५.वित्त विभाग/व्यय-१६/अर्थसंकल्प-३, मंत्रालय मुंबई-३२.
६.नियोजन विभाग/कार्यासन-१४६१, मंत्रालय मुंबई-३२.
७.अवर सचिव ( रोख/प्रशासन ), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई.३२
८.अवर सचिव ( ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९.निवड नस्ती, ऊर्जा-७.